मुनीया संवर्धन राखीव क्षेत्र व्यवस्थापन
समिती स्थापन करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वनविभाग**
**शासन निर्णय क्रमांक: डब्ल्यूएलपी-०३२१/प्र.क्र.६७/फ-१**
मंत्रालय, मुंबई- ४०००३२.
दिनांक : १७.०२.२०२२.

वाचा :-

१. शासन अधिसूचना, महसूल व वन विभाग क्र. डब्ल्यूएलपी-०३२१/प्र.क्र.६७/फ-१, दिनांक ११.०५.२०२१
२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचेकडील पत्र क्रमांक : कक्ष- २३(२)/ वजी / सर्वे/प्र.क्र.११६(अ)/२६७९/२०२१-२२, दिनांक २१.०१.२०२२

**प्रस्तावना :-**

शासनाने उपरोक्त संदर्भ क्रमांक १ वरील अधिसूचनेनुसार नागपूर जिल्हयातील नागपूर वन विभागातील बुटीबोरी व उत्तर उमरेड वनपरिक्षेत्रामधील ९६.०१ चौ.कि.मी. क्षेत्र मुनीया संवर्धन राखीव क्षेत्र म्हणून घोषित केले आहे. सदर क्षेत्राचे व्यवस्थापन करण्याकरीता तसेच प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव) तथा मुख्य वन्यजीव रक्षक यांना सल्ला देण्यासाठी मुनीया संवर्धन राखीव क्षेत्र व्यवस्थापन समिती गठीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

वन्यजीव (संरक्षण) अधिनियम, १९७२ चे कलम ३६-ख (१) व (२) मधील तरतूदीनुसार मुनीया संवर्धन राखीव क्षेत्राच्या व्यवस्थापनाकरीता खालीलप्रमाणे व्यवस्थापन समिती स्थापन करण्यात येत आहे :-

| अ.क्र. | नाव / पद | पदनाम |
|---|---|---|
| १ | उपवनसंरक्षक (प्रादेशिक), नागपूर वन विभाग, नागपूर | अध्यक्ष |
| २ | तालुका कृषी अधिकारी, उमरेड | सदस्य |
| ३ | पशुधन विकास अधिकारी, उमरेड | सदस्य |
| ४ | सरपंच, ग्रामपंचायत डव्हा (खापरी), ता. उमरेड, जि. नागपूर | सदस्य |
| ५ | सरपंच, ग्रामपंचायत खैरी, ता. उमरेड, जि. नागपूर | सदस्य |
| ६ | डॉ. विजय घुगे, अध्यक्ष, निसर्ग विज्ञान संस्था, नागपूर | सदस्य |
| ७ | श्री. प्रफुल्ल भांबूरकर, WTI, नागपूर | सदस्य |
| ८ | श्री. कुंदन हाते, सदस्य, राज्य वन्यजीव मंडळ | सदस्य |
| ९ | सहाय्यक वनसंरक्षक (जंकास-२), नागपूर वन विभाग स्थित उमरेड | सदस्य-सचिव |

उपरोक्त व्यवस्थापन समितीची कार्यकक्षा पुढीलप्रमाणे राहील:-

१. समितीची कार्यकक्षा फक्त मुनीया संवर्धन राखीव क्षेत्रापुरती मर्यादीत राहील.

२. सदर समिती संवर्धन राखीव क्षेत्राचे संरक्षण व व्यवस्थापन करण्याकरीता प्रस्ताव व सूचना मुख्य वन्यजीव रक्षक यांना पाठवेल व आवश्यक ते सहकार्य करेल.

३. संवर्धन राखीव क्षेत्रात वन्यजीव (संरक्षण) अधिनियम, १९७२ व इतर वन विषयक कायद्यांचा व अधिनियमांचा भंग होणार नाही याबाबत समिती मार्गदर्शन करेल.

४. समितीचा कार्यकाळ सदर शासन निर्णय निर्गमित झाल्याच्या दिनांकापासून ३ वर्षांपर्यंत राहील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२२०२१७१६३४४३६८१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SIDDESH TUKARAM SAWARDEKAR

Digitally signed by SIDDESH TUKARAM SAWARDEKAR
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=7dc40890d791d1b1e6bae88da52eabb63f1f3ab6258c7e318f8c37f3ae7c36f2, serialNumber=5712ce2d7a095c22e97ebb8f03c668b12eba1db0dd8e284883b7bd7fa74da65d, cn=SIDDESH TUKARAM SAWARDEKAR
Date: 2022.02.17 16:38:45 +05'30'

**(सिध्देश सावर्डेकर)**
**विशेष कार्य अधिकारी**
**महसूल व वन विभाग**

**प्रति,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव) पूर्व, नागपूर.
४. मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक), नागपूर.
५. उपवनसंरक्षक (प्रादेशिक), नागपूर वन विभाग, नागपूर.
६. सहाय्यक वनसंरक्षक (जंकास-२), नागपूर वन विभाग स्थित उमरेड
७. तालुका कृषी अधिकारी, उमरेड
८. पशुधन विकास अधिकारी, उमरेड
९. समितीमधील इतर सदस्य
१०.फ-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.